प्रबंधक, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक व प्रशासकीय सेवा, गट-ब या पदावरील अधिका-यांच्या महसुली विभाग वाटपातील बदलाबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक :-बदली-२०२०/प्र.क्र.(७२/२०)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ११ सप्टेंबर, २०२०.

**संदर्भ** - १) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि.२८.०४.२०१५.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.एससीटी-६५१३/(१५/१३)/तांशि-१, दि.२१.११.२०१६

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये श्रीमती संपदा देशमाने यांची सरळसेवेने प्रबंधक, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक व प्रशासकीय सेवा, गट-ब या पदावर शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय,यवतमाळ (जुने शासकीय तंत्रनिकेतन,यवतमाळ) येथे नियुक्ती करण्यात आली आहे. आता,श्रीमती संपदा देशमाने यांनी केलेल्या विनंतीस अनुलक्षून व संदर्भाधीन क्रमांक १ येथे नमूद अधिसूचनेतील नियम १२(अ) येथील तरतुदीनुसार, सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने त्यांच्या सध्याच्या महसुली विभागात खालील विवरणपत्रातील स्तंभ-४ नुसार बदल करण्यात येत असून त्यांची नवीन पदस्थापना स्तंभ-५ मध्ये दर्शविल्यानुसार राहील.

| अ.क्र | प्रबंधकाचे नाव व कार्यरत संस्था | पूर्वीचा महसुली विभाग | बदललेला महसुली विभाग | नवीन पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती संपदा देशमाने, प्रबंधक (गट-ब) शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, यवतमाळ (जुने शासकीय तंत्रनिकेतन, यवतमाळ) | अमरावती | पुणे | शासकीय हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरींग टेक्नॉलॉजी, पुणे |

२. उपरोक्त अधिका-यांच्या महसुली विभाग वाटपातील बदल व त्यानुषंगाने करण्यात आलेली पदस्थापना ही संबंधितांच्या विनंतीनुसार करण्यात आली असल्याने, नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्यासाठी शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता त्यांना अनुज्ञेय राहणार नाही.

३. उपरोक्त अधिका-यांनी कोणत्याही परिस्थितीत दि. ३० सप्टेंबर,२०२० पूर्वी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. संबंधित संस्थाप्रमुखांनी त्यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी.

४. या प्रकरणी रुजू होण्यास मुदतवाढ देण्याबाबतच्या कोणत्याही निवेदनाचा विचार केला जाणार नाही, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. उपरोक्त अधिका-यांचा रुजू अहवाल संबंधित संस्थाप्रमुखांनी संचालक,तंत्र शिक्षण यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९१११११५४४६८४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2020.09.11 11:55:42 +05'30'

**( समीर ढेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रतिः -** श्रीमती संपदा देशमाने, प्रबंधक (गट-ब),शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय,यवतमाळ.
(जुने शासकीय तंत्रनिकेतन,यवतमाळ)(प्राचार्यांमार्फत)

**प्रतः-**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. सह संचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, अमरावती / पुणे (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
४. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय,यवतमाळ
५. प्राचार्य,शासकीय हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरींग टेक्नॉलॉजी, पुणे.
६. प्राचार्य, जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ /पुणे.
७. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती/तांशि-१.